**यशदा, पुणे येथे जलसाक्षरता केंद्र आणि वन अकादमी चंद्रपूर, वाल्मी औरंगाबाद व डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ विकास प्रशासकीय प्रशिक्षण प्रबोधिनी अमरावती येथे विभागीय केंद्रे स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था)**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

दिनांक :- ३० नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ** :- शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/(प्र.क्र.०७/१६)/लाक्षेवि(आस्था), दि. ११ फेब्रुवारी, २०१६

**प्रस्तावना :-**

राज्यातील वापरायोग्य पाण्याची उपलब्धता मर्यादित असून गरजेपेक्षा कमी आहे. वाढती लोकसंख्या, वाढते उद्योग व अनियमित पर्जन्यमान यामुळे भविष्यात उपलब्ध पाण्यावरील ताण आणखी वाढणार आहे. उपलब्ध पाणी सर्व वापरकर्त्यांना त्यांच्या गरजेच्या प्रमाणात उपलब्ध होण्यासाठी पाण्याचा वापर अत्यंत काटकसरीने व नियोजनपूर्वक करण्याची आवश्यकता आहे. यासाठी समाजात जलजागृती व जलसाक्षरता निर्माण होण्याची गरज असून त्यादृष्टीने संदर्भ क्र. १ नुसार मागील वर्षी राज्यात राबविलेल्या जलजागृती सप्ताहास जनतेचा मोठा प्रतिसाद मिळाला होता. त्यानुषंगाने मा. वित्त मंत्री महोदयांनी २०१६ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये राज्यात कायमस्वरुपी जलसाक्षरता केंद्र निर्माण करण्याची घोषणा केली आहे. त्याची अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने जलसाक्षरता केंद्राची स्थापना, रचना व कार्यपध्दती याबाबत सविस्तर सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**संकल्पना :-**

पाण्यासंबंधीत काम करणाऱ्या शासकीय विभागामार्फत राबविल्या जाणाऱ्या विविध योजना जनतेपर्यंत पोहोचविण्यासाठी आणि पाण्याचा वापर नियोजनपूर्वक काटकसरीने करण्यासाठी जनतेचा सक्रीय सहभाग आवश्यक असून त्यादृष्टीने राज्यात कायमस्वरुपी जलजागृती अभियान राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. जलजागृतीसाठी विविध उपक्रम तयार करणे व जनतेपर्यंत पोहोचविण्यासाठी आवश्यक प्रशिक्षण देण्याची व्यवस्था जलसाक्षरता केंद्रामध्ये केली जाईल. जलजागृती उपक्रम जनतेपर्यंत पोहोचविण्यासाठी राज्यस्तर, जिल्हास्तर,तालुकास्तर, व ग्रामस्तरावर अनुक्रमे जलनायक, जलकर्मी व जलसेवक

अशा उस्फूर्त स्वयंसेवकांची संरचनात्मक शृंखला निर्माण केली जाईल. राज्यामध्ये राबविल्या जाणाऱ्या जलसाक्षरता उपक्रमांमध्ये समन्वय व सुसंगतपणा ठेवण्यासाठी राज्यस्तर, जिल्हास्तर, तालुकास्तरावर समन्वय समित्या निर्माण करुन त्यांच्याद्वारे जलसाक्षरतेचा कार्यक्रम राज्यात कायमस्वरुपी राबविला जाईल.

**शासन निर्णय :-**

१.० राज्यात यशदा पुणे येथे कायमस्वरुपी मुख्य जलसाक्षरता केंद्र आणि वन अकादमी, चंद्रपूर जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद व डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ विकास प्रशासकीय प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती येथे विभागीय केंद्रे स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**२.० जलसाक्षरता केंद्राची कार्यकक्षा व कार्यपध्दती**

जलसाक्षरता केंद्रामार्फत खालीलप्रमाणे प्रशिक्षण, संशोधन व प्रलेखन, तसेच अनुषंगिक सहाय्यकारी कामे करण्यात यावीत.

**२.१ प्रशिक्षण**

(१) जल साक्षरतेचा पाच वर्षाचा व वार्षिक प्रशिक्षण आराखडा तयार करणे.

(२) जलसाक्षरता विषयक प्रशिक्षणाच्या गरजांची निश्चिती करणे.

(३) प्रशिक्षणासाठी विविध मोड्यूल निश्चित करणे.

(४) विविध स्तरांवरील जलनायकांची निवड करणे.

(५) विविध पाणी वापरकर्ते/लाभधारक/जलनायक/जलकर्मी/ जलसेवक यांना प्रशिक्षण देणे.

(६) विभागीय केंद्राच्या प्रशिक्षणाचे नियोजन करणे व मार्गदर्शन करणे.

(७) जलसाक्षरता अभियान व प्रशिक्षणासंबंधी वाचन साहित्य व प्रसार साहित्य तयार करणे

(८) जलसाक्षरतेबाबत राज्यात कार्यशाळा आयोजित करणे व त्यामध्ये मार्गदर्शन करणे

**२.२ संशोधन व प्रलेखन**

राज्यातील शासनामार्फत पूर्ण झालेले व बांधकामाधीन प्रकल्पांचे जलसाठे, जलसंधारणाची कामे, सिंचन प्रकल्प, लोकसहभागातून पूर्ण झालेल्या योजना व त्यांचा जलमानसावर झालेला परिणाम, पाण्याचे प्रदुषण व उपाययोजना, पाण्याचा पुनर्वापर याबाबत संदर्भ साहित्य निर्माण करणे व जनतेला सहजपणे उपलब्ध करुन देणे, त्यासाठी आवश्यक तिथे संकेत स्थळाचा वापर करुन जनतेला सहजपणे माहिती उपलब्ध करुन

देणे, प्रशिक्षण व जलसाक्षरतेबाबत लघुपट/माहितीपट संबंधित शासकीय यंत्रणेस उपलब्ध करुन देणे, सर्वसामान्य जनतेला समजेल अशा सोप्या भाषेतील तांत्रिक साहित्याची निर्मिती करणे इत्यादि कामे करणे.

**२.३ जलसाक्षरता प्रसार व प्रसिध्दी:**

राज्यात जलसाक्षरता व जलजागृती निर्माण करण्यासाठी प्रसार व प्रसिध्दी बाबतचे धोरण तयार करणे, त्यासाठी साहित्य निर्मिती करणे, प्रतिवर्षी शासनाच्या धोरणानुसार राज्यात जलजागृती सप्ताह राबविण्यासाठी प्रशिक्षण देणे व त्यासाठी आवश्यक साहित्य निर्मिती करणे इत्यादी.

**२.४ सहाय्यकारी कामे**

पाण्याच्या क्षेत्रात कार्यरत असेले शासनाचे विविध विभाग उदा. जलसंपदा विभाग/ जलसंधारण विभाग /ग्रामविकास विभाग/पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग/रोजगार हमी योजना /कृषी विभाग /नगर विकास विभाग/उद्योग विभाग /पर्यावरण विभाग इत्यादी विभागाच्या यंत्रणांना जलसाक्षरतेसंबंधी धोरणात्मक मार्गदर्शन करणे.

**३.० यशदा पुणे येथील राज्यस्तरीय जलसाक्षरता केंद्राची रचना व पदांचा तपशील खालीलप्रमाणे राहील:-**

| अ. क्र | पदनाम | पद | संख्या |
|---|---|---|---|
| १ | संचालक जल साक्षरता केंद्र, यशदा | सहयोगी/सहाय्यक प्राध्यापक | १ |
| २ | कार्यकारी संचालक | सहाय्यक प्राध्यापक/ सहयोगी प्राध्यापक | १ |
| ३ | संशोधन अधिकारी (प्रलेखन) | संशोधन अधिकारी | २ |
| ४ | संशोधन अधिकारी (प्रशिक्षण) | संशोधन अधिकारी | ३ |
| ५ | संशोधन अधिकारी (माहिती शिक्षण व संवाद) | संशोधन अधिकारी | १ |
| ६ | संशोधन सहायक | संशोधन सहायक | ४ |
| ७ | लिपिक टंकलेखक | | ३ |

जलसाक्षरता केंद्रातील संचालक व इतर अधिकारी/कर्मचारी ही पदे यशदा संस्थेच्या कार्यप्रणाली नुसार प्रतिनियुक्ती/ करार तत्वावर भरण्याची कार्यवाही करावी.

**४.० विभागीय जलसाक्षरता केंद्राची रचना व पदांचा तपशील खालीलप्रमाणे राहील :-**

| **अ.क्र** | **पदनाम** | **संख्या** |
|---|---|---|
| १ | विभागीय संचालक | १ |
| २ | विभागीय कार्यकारी संचालक | १ |
| ३ | प्रलेखन अधिकारी | १ |
| ४ | प्रशिक्षण अधिकारी | १ |
| ५ | प्रशिक्षण सहायक | २ |
| ६ | प्रलेखन सहाय्यक | १ |
| ७ | लिपिक टंकलेखक | १ |

**५.० विभागीय जलसाक्षरता केंद्राचे कार्यक्षेत्र :-**

| **अ.क्र** | **जलसाक्षरता केंद्र / विभागीय केंद्र** | **कार्यक्षेत्र** |
|---|---|---|
| १ | **२** | **३** |
| १ | **यशदा, पुणे** | **पुणे,** नाशिक **आणि कोकण महसूल विभाग** |
| २ | जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद | औरंगाबाद महसूल विभाग |
| ३ | डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय आणि विकास प्रबोधिनी, अमरावती | अमरावती महसूल विभाग |
| ४ | वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर | नागपूर महसूल विभाग |

जलसाक्षरता उपकेंद्राचे विभागीय संचालक व इतर अधिकारी/कर्मचारी ही पदे त्या संस्थेच्या कार्यप्रणाली नुसार प्रतिनियुक्ती/ करार तत्वावर भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

५.० राज्यात जलसाक्षरता जलजागृतीचा उपक्रम लोकसहभागातून व स्वयंस्फूर्तीने पुढे येणाऱ्या स्वयंसेवकाद्वारे राबविण्याचे शासनाचे धोरण आहे. त्यासाठी खालीलप्रमाणे जलसेवक, जलनायक, जलकर्मी यांची संरचनात्मक फळी निर्माण करण्यात यावी.

## ५.१ जलसेवक

ग्रामस्तर व स्थानिक संस्था स्तरावर जलसाक्षरतेचे काम करणाऱ्या प्रशिक्षित व्यक्तीस "जलसेवक" असे संबोधण्यात यावे. प्रत्येक ग्राम पंचायत स्तरावर एक जलसेवक असेल.

### ५.१.१ जलसेवकाचे कार्य:-

(१) जलयुक्त शिवार अभियानाच्या अमंलबजावणीमध्ये तसेच सिंचन व्यवस्थापनाची कार्यक्षमता वाढविण्यास योगदान देणे.

(२) जलसाक्षरता कार्यक्रमात स्थानिक स्तरावर सक्रिय सहभाग घेणे.

(३) ग्रामसभेत/ इतर सभांमध्ये जलसाक्षरतेबाबत माहिती देणे. जलसाक्षरतेविषयी विविध उपक्रम आयोजित करुन/उपक्रमात सहभागी होऊन जलसाक्षरतेचा प्रसार करणे.

(४) शालेय/महाविद्यालयीन स्तरावर जलजागृती निर्माण करण्यास सहाय्य करणे इत्यादी.

### ५.१.२ जलसेवकाची अर्हता व निवड :-

(१) जलसेवक हा लिहिता वाचता येणारा व जीवनात उच्च मूल्ये जोपासणारा आणि त्याग व राष्ट्रभावनेने प्रेरित असावा.

(२) जलसेवक हा ग्रामसभेचा सदस्य असावा व त्याच्या निवडीस ग्रामसभेची मान्यता असावी.

(३) शासनाच्या विविध विकास उपक्रमांबाबत जाणकार अशी व्यक्ती, स्वच्छता दूत, सामाजिक कार्यकर्ते, राष्ट्रीय सेवा योजनेतील स्वयंसेवक, पाणलोट क्षेत्रात उत्कृष्ट काम केलेल्या व्यक्ती, पाणी वापर संस्थामध्ये कार्य केलेल्या व्यक्ती, सामाजिक बांधिलकी म्हणुन काम करणा-या व्यक्ती, स्वयंस्फूर्तीने पुढे येणा-या नागरिक यांना नियुक्तीस प्राधान्य द्यावे.

(४) जलसेवकाचे कार्य समाधानकारक नसल्यास ग्रामसभा/स्थानिक स्वराज्य संस्था त्यांची निवड रद्द करता येईल.

(५) ग्रामसेवकांनी निवड झालेल्या जलसेवकाची यादी गट विकास अधिकारी पंचायत समिती यांचे मार्फत, तालुकास्तरीय, जिल्हास्तरीय जलसाक्षरता समितीकडे व संबंधीत जलसाक्षरता केंद्राकडे पाठवावी.

(६) जलसेवकाने केलेल्या कामाची नोंद संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांनी ठेवावी.

### ५.२ जलकर्मी

पाण्याबाबतचे उपक्रम राबविणारे शासनाच्या, तसेच शासनास सहाय्यकारी संस्थातील विविध विभागांचे जनतेशी थेट संपर्क असणारे प्रशिक्षित क्षेत्रिय कर्मचारी/अधिकारी यांना जलकर्मी असे संबोधण्यात यावे. त्यांना जलसाक्षरता व जलजागृतीचे आवश्यक जलसाक्षरता केंद्रामार्फत प्रशिक्षण देण्यात यावे.

### ५.३ जलनायक

विविध स्तरांवर प्रशिक्षण देण्याचा व जलक्षेत्रातील कामाचा अनुभव असणा-या प्रशिक्षकांना “जलनायक” असे संबोधण्यात यावे. विविध स्तरावरील जलनायकांची संख्या पुढीलप्रमाणे असेल: **राज्यस्तर** २४, **विभागस्तर** (प्रत्येक विभागातून ८ प्रमाणे) ४८, **जिल्हास्तर** ३४० (प्रत्येक जिल्ह्यातून १० जलनायक), **तालुका स्तर** ३२२४(प्रत्येक तालुक्यास १२ प्रमाणे). या संख्येमध्ये आवश्यकतेनुसार बदल करणे, विविध स्तरावरील जलनायकांची कार्यकक्षा निश्चित करणे, जलनायकांच्या निवडीचे निकष ठरवून त्यांची निवड करणेची कार्यवाही जलसाक्षरता केंद्रामार्फत करावी. ग्रामस्तरावरील जलसेवकाला मार्गदर्शन करणे तसेच जलकर्मींना मार्गदर्शन करणे, जलजागृतीबाबत मार्गदर्शन करणे ही जलनायकांची कार्यकक्षा राहील.

५.४ जलसेवक, जलकर्मी व जलनायक यांच्या निवडीचे निकष, त्यांची संख्या व कार्यपध्दती याबाबत यशदा पुणे मार्फत वेळोवेळी मार्गदर्शक सूचना देण्यात याव्यात.

### ६.० समन्वय

राज्यात जलजागृती निर्माण करण्यासाठी राबविल्या जाणाऱ्या विविध उपक्रमाचे समन्वय करण्यासाठी विविध स्तरांवर खालीलप्रमाणे समित्या स्थापन करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | समन्वय समिती | अध्यक्ष | रचना |
|---|---|---|---|
| १. | राज्यस्तरीय जलसाक्षरता समिती | प्रधान सचिव (जलसंपदा) | परिशिष्ट-अ नुसार |
| २. | यशदा स्तरावरील जलसाक्षरता समिती | उप महासंचालक यशदा | परिशिष्ट ब नुसार |
| ३. | जिल्हास्तरीय जलसाक्षरता समिती | जिल्हाधिकारी | परिशिष्ट क नुसार |
| ४. | तालुकास्तरीय जलसाक्षरता समिती | तहसिलदार | परिशिष्ट ड नुसार |

### ६.१ राज्यस्तरीय समितीची कार्यकक्षा

(१) विविध विभागातील जलसाक्षतेबाबतचे विषय, धोरणे व अडचणी बाबत निर्णय घेणे.

(२) जलसाक्षरतेबाबतची प्रचार व प्रसिध्दीसाठी माध्यमे व धोरण ठरवणे.

(३) संशोधन आणि प्रलेखानाचा आढावा घेणे.

(४) सर्वसाधारणपणे राज्यस्तरीय समन्वय समितीची बैठक वर्षातून दोन वेळा घेण्यात यावी.

### ६.२ यशदा स्तरावरील जलसाक्षरता समितीची कार्यकक्षा

(१) राज्यस्तरीय समितीकडून प्राप्त होणाऱ्या निर्देशांची अंमलबजावणी करण्यासाठी नियोजन करणे.

(२) जलसाक्षरता केंद्र व विभागीय केंद्राच्या प्रशिक्षण आराखडयास मान्यता देणे. जलसाक्षरता केंद्राच्या कामकाजाचा वेळोवेळी आढावा घेणे. प्रशिक्षण कार्यक्रमाचे नियोजन तसेच प्रत्यक्ष अंमलबजावणीचा आढावा घेणे.

(३) तालुकास्तरीय, जिल्हास्तरीय, विभागस्तरावरील आणि राज्यस्तरावरील जलनायक यांची निवड करणे, त्यात बदल करणे, निवड रद्द करणे, इत्यादी.

(४) विविध विभागातून जलकर्मी या पदासाठी उपलब्ध होऊ शकणाऱ्या कर्मचाऱ्यांची यादी अंतिम करणे.

(५) यशदा स्तरावरील समितीच्या वर्षातून किमान तीन बैठका घेण्यात याव्यात.

### ६.३ जिल्हास्तरीय जलसाक्षरता समिती

(१) जिल्हयातील वर्षभरातील जलसाक्षरता कार्यक्रमाचा आराखडा व अहवालचा आढावा घेऊन अंतिम करणे.

(२) जलजागृती कार्यक्रम उदा. जलजागृती, वृक्षारोपण, इत्यादींचे नियोजन व अंमलबजावणी करणे.

(३) जिल्हयातील जलसाक्षरता विषयाशी संबंधित तज्ञ, अशासकीय / शासकीय व्यक्ती, स्वयंसेवी संस्था यांची माहिती संकलित करुन विभागीय केंद्रास देणे. जिल्हास्तर व तालुकास्तरावरील जलनायक, जलकर्मी यांच्या निवडीसाठी विभागीय केंद्रास साहाय्य करणे.

(४) जलकर्मी व जलसेवक यांच्या प्रशिक्षणाच्या गरजा, विषय, अडचणी, विभागीय केंद्रास कळविणे.

(५) जिल्हास्तरीय जलसाक्षरता समितीच्या वर्षातून किमान तीन बैठका घेण्यात याव्यात.

### ६.४ तालुकास्तरीय जलसाक्षरता समितीची कार्यकक्षा

(१) जलसेवकांच्या निवडीबाबत मार्गदर्शन करणे व त्यांच्या कार्याचे मूल्यमापन करणे.

(२) जलसेवकांच्या कामांचे संनियंत्रण करणे.

(३) वेळोवेळी होणा-या प्रशिक्षणाचा आढावा घेणे.

(४) शासनाच्या विविध विभागाच्या कार्यक्रम/ उपक्रमामध्ये समन्वय ठेवणे.

(५) पाणी वापर संस्थांशी समन्वय करून त्यांचे सक्षमीकरणासाठी प्रयत्न करणे.

**७.० जल साक्षरता केंद्रासाठी निधी :-**

जलसाक्षरता राज्यस्तरीय केंद्र व विभागीय केंद्रासाठी आवश्यक निधी जलसंपदा विभागाकडून मागणीनुसार यशदा पुणे यांचेकडे वेळोवेळी वर्ग करण्यात येईल.सदर निधीचा विनियोग यशदाच्या कार्यप्रणालीनुसार करण्यात यावा.लेखा परीक्षण आणि इतर वित्तीय बाबी यशदाच्या मानकानुसार असतील. जलसाक्षरता केंद्र व विभागीय केंद्र यावर यशदाचे प्रशासकीय नियंत्रण राहील.

८.० जलसाक्षरता केंद्र व विभागीय केंद्र यांच्या कामकाजाबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना जलसंपदा विभाग/ यशदाकडून निर्गमित करण्यात येतील.

९.० जलजागृती **व** जलसाक्षरतेचे उत्कृष्ट काम करणाऱ्या जलनायक, जलकर्मी व जलसेवकांचा प्रतिवर्षी गौरव करण्यात यावा. त्याबाबतची प्रणाली यशदाने निश्चित करावी.

१०.० जलजागृती व जलसाक्षरतेचे काम जलनायक, जलकर्मी व जलसेवकांनी स्वयंस्फूर्तीने सामाजिक बांधिलकीतून करावयाचे असल्याने त्याबद्दल त्यांना कोणताही मोबदला अथवा नियमित आर्थिक मानधन दिले जाणार नाही. जलसाक्षरता केंद्र /विभागीय केंद्राद्वारे संस्थेमध्ये आयोजित प्रशिक्षण कार्यक्रमात जलनायक, जलकर्मी व जलसेवकांनी व्याख्यान दिल्यास यशदाच्या प्रचलित नियमानुसार त्यांना मानधन देण्यात यावे.

११.० सदरचा शासन निर्णय साप्रविच्या अनौ. संदर्भ क्र.२९/१६, दि.१९/०८/२०१६ तसेच वन विभाग, जलसंधारण विभाग, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६११३०१७२१५५५७२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

S M Upase

Digitally signed by S M Upase
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary (CAD), postalCode=400032, st=Maharashtra, cn=S M Upase
Date: 2016.11.30 17:58:25 +05'30'

**सोबत : परिशिष्ट अ, ब, क व ड** **(शि. मा. उपासे)**

**सचिव (जसंनि व लाक्षेवि)**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव , राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) सर्व विधानसभा सदस्य/ विधान परिषद सदस्य
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) सर्व अ.मु.स/प्रधान सचिव / सचिव , मंत्रालय, मुंबई
७) महासंचालक, यशदा , पुणे.
८) सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
९) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद
१२) महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी), नाशिक
१३) संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय आणि विकास प्रबोधिनी, अमरावती.
१४) संचालक, वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर.
१५) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
१६) सर्व जिल्हाधिकारी
१७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
१८) सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१९) संबंधीत समिती सदस्य, राज्यस्तरीय जलसाक्षरता समिती

२०) संबंधीत समिती सदस्य, यशदा स्तरीय जलसाक्षरता समिती

२१) संबंधीत समिती सदस्य, जिल्हा स्तरीय जलसाक्षरता समिती

२२) संबंधीत समिती सदस्य, तालुका स्तरीय जलसाक्षरता समिती

२३) सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग

२४) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

२५) सर्व सह सचिव /अवर सचिव , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

२६) अवर सचिव/ कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबुई.

**२७)** निवड नस्ती.

## शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था), दि. ३० नोव्हेंबर, २०१६ चे सहपत्र

## परिशिष्ट अ

### १. राज्यस्तरीय जलसाक्षरता समितीची रचना

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (जलसंपदा) | अध्यक्ष |
| २ | महासंचालक, यशदा | सहअध्यक्ष |
| ३ | महासंचालक, (वाल्मी) | सहअध्यक्ष |
| ४ | विभागीय आयुक्त (सर्व) | सदस्य |
| ५ | उपमहासंचालक यशदा तथा अध्यक्ष यशदा स्तरीय समिती | सदस्य |
| ६ | सहसचिव, (वने) महसूल व वन विभाग | सदस्य |
| ७ | उपसचिव (प्रशिक्षण) सामान्य प्रशासन विभाग. | सदस्य |
| ८ | उपसचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग | सदस्य |
| ९ | उपसचिव, जलसंधारण/रोजगार हमी योजना | सदस्य |
| १० | उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| ११ | उपसचिव, कृषि व पशुसंवर्धन विभाग | सदस्य |
| १२ | उप सचिव, शालेय शिक्षण विभाग | सदस्य |
| १३ | उपसंचालक, नगरपालिका प्रशासन | सदस्य |
| १४ | सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ | सदस्य |
| १५ | संचालक/ कार्यकारी संचालक, जलसाक्षरता केंद्र, यशदा | सदस्य |
| १६ | संचालक/ उपसंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग | सदस्य |
| १७ | शासनाने नामनिर्देशित केलेले दोन अशासकीय सदस्य (या क्षेत्रात उल्लेखनीय काम केलेली व्यक्ती /तज्ञ) | सदस्य |
| १८ | नामनिर्देशित केलेले दोन जलनायक (यशदा जलसाक्षरता केंद्राने नामनिर्देशित करावयाचे) | सदस्य |
| १९ | उपसचिव, जलसंपदा | सदस्य-सचिव |

**शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था), दि. ३० नोव्हेंबर, २०१६ चे सहपत्र**

**परिशिष्ट ब**

**१. यशदा स्तरीय जलसाक्षरता समितीची रचना**

| | | |
|---|---|---|
| १ | उपमहासंचालक, यशदा | अध्यक्ष |
| २ | संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| ३ | संचालक, राग्राविसं-यशदा | सदस्य |
| ४ | संचालक, मृद्संधारण, कृषि विभाग | सदस्य |
| ५ | कार्यकारी संचालक पाटबंधारे विकास महामंडळ (सर्व) | सदस्य |
| ६ | उपसचिव, जलसंपदा | सदस्य |
| ७ | विभागीय संचालक, विभागीय जलसाक्षरता केंद्र | सदस्य |
| ८ | उपसचिव, नगर विकास विभाग | सदस्य |
| ९ | संचालक, शिक्षण विभाग | सदस्य |
| १० | अपर मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा, पुणे | सदस्य |
| ११ | मुख्य अभियंता म.जी.प्रा. चे प्रतिनिधी | सदस्य |
| १२ | शासनाने नामनिर्देशित केलेले दोन अशासकीय सदस्य (या क्षेत्रात उल्लेखनीय काम केलेली व्यक्ती /तज्ञ) | सदस्य |
| १३ | यशदा जलसाक्षरता केंद्राने नामनिर्देशित केलेले दोन जलनायक | सदस्य |
| १४ | संचालक, जलसाक्षरता केंद्र, यशदा | सदस्य |
| १५ | कार्यकारी संचालक, जलसाक्षरता केंद्र, यशदा | सदस्य सचिव |

## शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था), दि. ३० नोव्हेंबर, २०१६ चे सहपत्र

## परिशिष्ट क

### १. जिल्हा स्तरीय जलसाक्षरता समितीची रचना

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद | सहअध्यक्ष |
| ३. | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | निमंत्रक |
| ४. | कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे, जिल्हा परिषद | समन्वयक |
| ५. | कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे (जलसंधारण) | सदस्य |
| ६. | शिक्षणाधिकारी, जिल्हापरिषद | सदस्य |
| ७. | प्रकल्प संचालक जि.ग्रा.वि.यं. | सदस्य |
| ८. | विभागीय संचालक, विभागीय जल साक्षरता केंद्र औरंगाबाद/अमरावती/ चंद्रपूर | सदस्य |
| ९. | यशदा जलसाक्षरता केंद्राचे प्रतिनिधी- पुणे/ नाशिक/ कोकण विभागाकरिता | सदस्य |
| १०. | उप जिल्हाधिकारी (रोहयो) | सदस्य |
| ११. | उप संचालक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| १२. | उपवनसंरक्षक | सदस्य |
| १३. | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| १४. | कार्यकारी अभियंता (ग्रा पा पू) | सदस्य |
| १५. | कार्यकारी अभियंता (म.जि प्रा ) | सदस्य |
| १६. | मा.पालकमंत्री यांनी नामनिर्देशित केलेले जिल्ह्यातील दोन सदस्य (या क्षेत्रातील उल्लेखनीय काम केलेली व्यक्ती/तज्ञ) | सदस्य |
| १७. | मा.पालकमंत्री यांनी नामनिर्देशित केलेले जिल्ह्यातील दोन जलसेवक | सदस्य |
| १८. | कार्यकारी अभियंता, (सिंचन व्यवस्थापन), जलसंपदा विभाग (एकाच मुख्यालयी एकापेक्षा अधिक का.अ. असल्यास कार्यकारी संचालक पाटबंधारे महामंडळ हे ठरवतील) | सदस्य सचिव |

**शासन निर्णय, क्र. वाल्मी-२०१६/प्र.क्र.६९/१६ लाक्षेवि (आस्था), दि. ३० नोव्हेंबर, २०१६ चे सहपत्र**

## परिशिष्ट ड

### १. तालुका स्तरीय जलसाक्षरता समितीची रचना

| | | |
|---|---|---|
| १ | तहसिलदार | अध्यक्ष |
| २ | गट विकास अधिकारी | सह अध्यक्ष |
| ३ | तालुका कृषी अधिकारी | सदस्य |
| ४ | वन परिक्षेत्र अधिकारी | सदस्य |
| ५ | लागवड अधिकारी (सामाजिक वनीकरण) | सदस्य |
| ६ | उपअभियंता(लपा) जिल्हा परिषद | सदस्य |
| ७ | उपअभियंता(स्थानिकस्तर) | सदस्य |
| ८ | उप अभियंता ग्रा पा पु | सदस्य |
| ९ | उपअभियंता ,जलसंपदा | सदस्य सचिव |
| १० | जलनायक (तालुकास्तर) ४ | अशासकीय सदस्य |
| ११ | जलसेवक (तालुकास्तर) ४ | अशासकीय सदस्य |